नागपूर मध्यवर्ती कारागृह याच्या ताब्यातील
जमीन रामकृष्ण मठ धंतोली नागपूर याना
देण्यासाठी महसूल विभागाकडे वर्ग करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.जमीन ०१२१/५/प्र.क्र.१०१/पीआरएस-२
मंत्रालय,मुंबई, ४०० ०३२, दिनांक : २३ मे, २००३.

वाचा:-१) अध्यक्ष,रामकृष्ण मठ,धंतोली नागपूर यांनी शासनास दिलेली दि.१६.८.२००१, १३.८.२००२ व दि.३.१०.२००२ ची पत्रे.
२)कारागृह उपमहानिरीक्षक,पूर्व विभाग,नागपूर यांचे क्र.बांधकाम/नामका/रामकृष्ण मठ/२५६१/पू.वि.११,दि.१८.७.२००२ चे पत्र.
३) या विभागाचे समक्रमांकित दि.२७ ऑगस्ट, २००२ चे पत्र.
४) जिल्हाधिकारी,नागपूर यांचे पत्र क्र.अका/नझूल/का.वि.९७५/२००२ दिनांक २३ सप्टेंबर, २००२ चे पत्र.

<u>शासन निर्णय</u>:- रामकृष्ण मठ,धंतोली नागपूर ही धर्मादाय संस्था असून या संस्थेचा त्यांच्या शैक्षणिक, सामाजिक, व धर्मादाय कार्यासाठी पॉलिक्लिनिक,विद्यार्थी वसतिगृह, ग्रंथालय व शिक्षण व सांस्कृतिक केंद्र बांधण्याचा मानस असून या सुविधेचा लाभ कारागृहातील बंदी व कारागृह कर्मचारी यांनाही देण्यात येणार असल्याने या प्रयोजनासाठी व मठाच्या विकासासाठी मौजा,धंतोली नागपूर येथील नगर भूमापन क्र.४९८/१ मधील काही जमीन देण्याबाबत शासनास विनंती केलेली आहे. यासदर्भात संस्थेचे अध्यक्ष, कारागृह विभागाचे अधिकारी,जिल्हाधिकारी,नागपूर व स्थानिक प्राधिकारी यांनी जागेची प्रत्यक्ष पाहणी केलेली असून उपरोक्त अधिकाऱ्यांसमवेत दि.२७.८.२००२ रोजी बैठक झालेली असून सदर धर्मादाय संस्थेचे कार्य व कारागृहातील बंदी व कर्मचाऱ्यांना होणारे लाभ लक्षात घेता बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाप्रमाणे जिल्हाधिकारी नागपूर यांनी जमिनीचे क्षेत्रफळ मोजून व रामकृष्ण मठाची संमती घेऊन प्रस्ताव शासनाच्या मंजूरीसाठी पाठविण्याबाबत उपरोक्त दि. २७.८.२००२ च्या पत्रान्वये कळविलेले होते. जिल्हाधिकारी, नागपूर यांनी त्यांच्या दि.२३.९.२००२ च्या पत्रान्वये दिनांक २७.८.२००२ च्या बैठकीतील निर्देशाप्रमाणे जागेची मोजणी केली असता मौजा धंतोली नागपूर येथील नगर भूमापन क्र.४९८/१ मधील ७७९१.५५ चौ.मी. जमीन धर्मादाय कार्यासाठी रामकृष्ण मठ नागपूर यांना प्रदान करण्याची शिफारस केलेली आहे.

२. जिल्हाधिकारी, नागपूर यांचे अभिप्राय रामकृष्ण मठ धंतोली नागपूर या संस्थेचे धर्मादाय कार्य व कारागृहातील बंदी व कर्मचारी यांना होणारे फायदे या बाबींचा काळजीपूर्वक विचार करून मौजा धंतोली, नागपूर येथील नागपूर मध्यवर्ती कारागृहाच्या ताब्यात असलेली नगरभूमापन क्र.४९८/१ मधील ७७९१.५५ चौ.मी.जमीन ,रामकृष्ण मठ,धंतोली नागपूर यांना पॉलिक्लिनिक ,विद्यार्थी वसतिगृह,ग्रंथालय व शिक्षण व सांस्कृतिक केंद्र उभारण्यास महसूल व व वन विभागाचे नियमानुसार अशा प्रकारच्या सार्वजनिक हिताच्या

काम करणा-या विश्वस्त संस्थेस देण्यासाठी महसूल व वन विभागाकडे वर्ग करण्याबाबत खालील अटीच्या अधीन राहून शासन मान्यता देत आहे:-

१) प्रश्नाधीन ७७९१.५५ चौ.मी.जमीन कारागृह महानिरीक्षक,पुणे यांनी महसूल विभागाकडे (जिल्हाधिकारी नागपूर) तात्काळ हस्तांतरीत करण्याची कार्यवाही करावी.

२) जिल्हाधिकारी,नागपूर यांनी प्रश्नाधीन जमीन रामकृष्ण मठ या संस्थेस उपरोक्त प्रयोजनासाठी मंजूर करण्याबाबतचा स्वयंस्पष्ट प्रस्ताव सर्व संबंधित कागदपत्रांची पूर्तता करुन विभागीय आयुक्तांमार्फत शासनाच्या महसूल व वन विभागाकडे तात्काळ सादर करावा.

३) रामकृष्ण मठ,धंतोली नागपूर, यांचेमार्फत पॉलिक्लिनिक ,विद्यार्थी वसतिगृह, ग्रंथालय व शिक्षण व सांस्कृतिक केंद्र उभारण्यासाठी येणारा संपूर्ण खर्च रामकृष्ण मठ या संस्थेमार्फत करण्यात येईल.

४) या ठिकाणी पॉलीक्लिनिक बांधण्यात येणार आहे. तेथे बंदयांना विनामूल्य आणि त्या ठिकाणी रहात असलेल्या कर्मचा-यांना मठाच्या नियमानुसार नोंदणी शुल्क भरुन उपचार व संदर्भ सेवेचा अग्रक्रमाने लाभ देण्यात येईल.

५) कारागृहामध्ये महिन्यातून एकदा आध्यात्मिक शिबीर मठाच्या वतीने विनामूल्य आयोजित करण्यात येईल.

६) या संकुलामध्ये ग्रंथालयाचा वापर नागपूर येथे रहात असलेल्या कारागृह कर्मचारी/ बंदी यांच्या पाल्यांना मठाच्या नियमानुसार अग्रक्रमाने करता येईल.

७) या ठिकाणी विद्यार्थी वसतिगृह स्थापन करण्यात येणार आहे. तेथे ५% पर्यंत कारागृह कर्मचारी/ बंदी यांच्या पाल्यांना मठाच्या नियमानुसार प्रवेश दिला जाईल. मात्र ते मठाच्या नियमानुसार पात्र असणे आवश्यक आहे.

८) रामकृष्ण मठ या धर्मादाय संस्थेस देण्यात येणा-या जमिनीवर जी सुविधा निर्माण करणार आहे व जे उपक्रम राबविणार आहेत त्यामुळे कारागृहाच्या सुरक्षिततेला कोणत्याही प्रकारची बाधा येणार नाही अथवा कारागृह नियमावलीचे उल्लंघन होणार नाही याची काळजी घेण्यात यावी.

९) वरील मुद्दा क्र.३ ते ८ मधील बाबी मान्य असल्याबाबतचे लेखी अभिप्रमाणित केलेले हमीपत्र अध्यक्ष,रामकृष्ण मठ,धंतोली,नागपूर यांनी जिल्हाधिकारी नागपूर व कारागृह महानिरीक्षक पुणे यांना करुन दयावे.

३. हा शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( र.ना.माळी )
कार्यासन अधिकारी,गृह विभाग,महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे उपसचिव,
मा.राज्यमंत्री(गृह) यांचे खाजगी सचिव,
अपर मुख्य सचिव(गृह ) मंत्रालय,मुंबई-३२
प्रधान सचिव(महसूल)महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
प्रधान सचिव(वित्त) वित्त विभाग,,मंत्रालय,मुंबई-३२
कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे.
विभागीय आयुक्त, नागपूर विभाग,नागपूर,
जिल्हाधिकारी,नागपूर,
आयुक्त, नागपूर महानगरपालिका,नागपूर,
अध्यक्ष, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर,
कारागृह उपमहानिरीक्षक,(मुख्यालय)पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक,पूर्व विभाग,नागपूर,
अधिक्षक, मध्यवर्ती कारागृह,नागपूर,
महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परीक्षा )(लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
अध्यक्ष,रामकृष्ण मठ,धंतोली नागपूर,
निवडनस्ती-पीआरएस-२.

-----